कोषागारातून रोख देय अनुदान
संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान
सन २०१४-१५ च्या जिल्हास्तरीय
बक्षीसांसाठी अनुदानाचे वितरण.
लेखाशीर्ष २२१५ १९८८

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः क्र.संगाग्रा-१४१४/प्र.क्र.९५/पापु-१६

जी.टी. रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ०१
तारीख: ९ मार्च, २०१५

वाचा

1) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.१ जुलै, २०१४**
2) **शासन निर्णय क्रमांकः अभियान-१००८/प्र.क्र.१७७/पापु-१६, दि.१५ सप्टेंबर, २००८.**
3) **शासन निर्णय क्रमांकः निर्मल-२०१५/प्र.क्र.०३/पापु-०८, दि.५.२.२०१५.**
4) **शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा-१४१४/प्र.क्र.९५/पापु-१६, दि.१० फेब्रुवारी, २०१५.**
5) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी, २०१५**
6) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.९ फेब्रुवारी, २०१५**

प्रस्तावना

संदर्भाधीन क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ (महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १२ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८, दि. १८ जून, २०१४ अन्वये प्रसिद्ध करण्यात आले असल्याचे कळविण्यात आले आहे.

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात २२१५ १९८८ या लेखाशिर्षाखाली रु.६००.८८ लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे एकूण अर्थसंकल्पीत केलेल्या निधीपैकी रू.४००.०० लक्ष इतके अनुदान संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र.६ येथील परिपत्रकान्वये वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उर्वरीत रू.५०.६६ लक्ष (७५ टक्के एवढ्या मर्यादेत) रक्कम उपलब्ध करुन दिलेली आहे. सदर रु.५०.६६ लक्ष निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील रू. ६००.८८ लाख तरतूदीपैकी रु.५०.६६ लाख (रू. पन्नास लाख सहासष्ट हजार फक्त) अनुदान सन २०१४-१५ मधील अभियानाच्या जिल्हास्तरीय बक्षीस वितरणासाठी संबधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार रोख स्वरुपात मुक्त करण्यात येत आहे.

२. हा खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता - ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता-१०७ मलप्रणाल सेवा- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजना- (०४) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, (०४) (०५) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी प्रचार, प्रसिध्दी व बक्षिस योजना (२२१५ १९८८) २६, जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा.

३. या शासन निर्णयाखालील अनुदान पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या अनुदानातून करण्यात येणारा खर्च जिल्हा परिषदेच्या लेख्यात अनुदान म्हणून वरील लेखाशीर्षात वेगळा ठेवण्यात यावा.

आ) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे.

इ) संबंधित जिल्हा परिषदांनी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

ई) अट क्रमांक ३-अ आणि ३-आ यांची पूर्तता झाली आहे, याची खात्री करण्यासाठी महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल- नागपूर यांच्याकडे तपासणीसाठी जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावेत.

उ) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील कार्यासन क्र.पापु-०४, पापु-१६ व पापु-२० ला सादर करावे.

ऊ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी, २०१५ व शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.९ फेब्रुवारी, २०१५ च्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१७१९१५४६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.09 18:57:26 +05'30'

**(वि.य.गोखले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ मुबई/नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
२. विभागीय आयुक्त, सर्व.
३. उपायुक्त विकास, विभाग सर्व.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिबीडी, बेलापूर, नवी मुंबई.
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
९. उपमुख्य कार्यकारी अधिकार (ग्रा.पं.), जिल्हा परिषद, सर्व.
१०.नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुबई.
११.वित्त विभाग (व्यय-३) मंत्रालय, मुबई.
१२.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
१३.उपमुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१४.कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुबई.
१५.निवड नस्ती, पापु-१६.

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र. संगाग्रा-१४१४/प्र.क्र.९५/पापु-१६, दि.९ मार्च, २०१५ सोबतचे सहपत्र.

(रू.लाखात)

| अ. क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | दि.१० फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी | सन २०१४-१५ मधील जिल्हा स्तरावरील बक्षीसांसाठी या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ३६.९५ | - |
| २ | रायगड | २३.५० | - |
| ३ | रत्नागिरी | १९.६० | - |
| ४ | सिंधुदूर्ग | १८.९५ | - |
| ५ | नाशिक | २३.६५ | ०.८५ |
| ६ | धुळे | ५.६० | १०.७५ |
| ७ | नंदूरबार | ६.९० | १०.७५ |
| ८ | जळगांव | १२.७५ | १०.७५ |
| ९ | अहमदनगर | १२.३० | १०.७५ |
| १० | पुणे | १२.४५ | ६.८१ |
| ११ | सातारा | १०.१५ | ०.०० |
| १२ | सांगली | ९.५० | ०.०० |
| १३ | सोलापूर | १०.१५ | ०.०० |
| १४ | कोल्हापूर | १०.८० | ०.०० |
| १५ | औरंगाबाद | ९.८५ | ०.०० |
| १६ | जालना | ८.२० | ०.०० |
| १७ | परभणी | ८.८५ | ०.०० |
| १८ | हिंगोली | ६.२५ | ०.०० |
| १९ | बीड | १०.१५ | ०.०० |
| २० | नांदेड | १३.४० | ०.०० |
| २१ | उस्मानाबाद | ८.२० | ०.०० |
| २२ | लातूर | ९.५० | ०.०० |

| अ. क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | दि.१० फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी | सन २०१४-१५ मधील जिल्हा स्तरावरील बक्षीसांसाठी या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| २३ | बुलढाणा | ११.४५ | ०.०० |
| २४ | अकोला | ७.५५ | ०.०० |
| २५ | वाशिम | ६.९० | ०.०० |
| २६ | अमरावती | १३.१० | ०.०० |
| २७ | यवतमाळ | १३.४० | ०.०० |
| २८ | वर्धा | ८.२० | ०.०० |
| २९ | नागपुर | १२.४५ | ०.०० |
| ३० | भंडारा | ७.५५ | ०.०० |
| ३१ | गोंदिया | ८.२० | ०.०० |
| ३२ | चंद्रपूर | १२.७५ | ०.०० |
| ३३ | गडचिरोली | १०.८० | ०.०० |
| | **एकूण** | **४००.००**<br>**(रू.चार कोटी फक्त)** | **५०.६६**<br>**(रू.पन्नास लाख, सहासष्ट हजार फक्त)** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.09 18:58:15 +05'30'

(वि.य.गोखले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन